**गृह विभागातील वरिष्ठ अधिकाऱ्यांना महत्वाच्या तातडीच्या कामासाठी विमान प्रवास करण्यासाठी परवानगी देण्याचे तसेच विमान प्रवास खर्चाच्या प्रतिपूर्तीस मंजूरी देण्याचे अधिकार अ.मु.स.(गृह)/प्रधान सचिव यांना प्रदान करणेबाबत.**

शासन निर्णय
गृह विभाग

शासन निर्णय. क्रमांकः-एनाईई-०१०८/प्र.क्र.५७३/आस्था-२.
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२, दिनांक:-८ ऑक्टोबर, २००९.

**प्रस्तावना:-**

राज्याने निधीचे सुयोग्य व्यवस्थापन व्हावे या उद्देशाने काटकसरीच्या उपाययोजना शासन निर्णय, वित्त विभाग, क्र.बीजीटी-१०.००/प्र.क्र.५६/२०००/वित्तीय सुधारणा, दि.१०.९.२००१ व शासन निर्णय, वित्त विभाग, क्र.बीजीटी-१०.०८/प्र.क्र.४९/२००८/वित्तीय सुधारणा-१, दि.१३.८.२००८ अन्वये प्रस्तुत करण्यात आल्या आहेत. सदर शासन निर्णयातील तरतूदीनुसार सचिव/सह सचिव/उप सचिव/अवर सचिव दर्जाच्या अधिकाऱ्यांना न्यायालयीन तसेच विधीमंडळ कामकाजासाठी तातडीने जाण्यासाठी इतर कोणत्याही मार्गाने वेळेत पोहोचण्याची शक्यता नसल्यास संबंधीत प्रशासनिक विभागाच्या सचिवांच्या पूर्व परवानगीने इकॉनॉमी क्लासने विमान प्रवास अनुज्ञेय आहे. परंतु सदर वित्त विभागाच्या शासन निर्णयान्वये फक्त विधीमंडळ व न्यायालयीन कामकाजा पुरतीच विमानाने प्रवासाची अनुज्ञेयता सिमित ठेवली आहे. यास्तव, गृह विभागातील कामकाजाची व्याप्ती कामाचे स्वरुप व महत्व लक्षात घेता, गृह विभागातील सह सचिव व उपसचिव यांना महत्वाच्या व तातडीच्या कामासाठी विमानाने प्रवास करण्यास मान्यता देण्याची बाब विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

गृह विभाग (मुद्दे) च्या अधिनस्त कार्यासनाकडे असलेल्या विषयांच्या अनुषंगाने विभागातील संबंधित सह सचिव व उप सचिव यांना न्यायालयीन कामकाज, अधिवेशनाचे कामकाज, केंद्रीय लोकसेवा आयोग व माहिती अधिकारातील कामकाज तसेच कायदा व सुव्यवस्थेच्या अनुषंगाने होणाऱ्या बैठकांना मुख्यालयाबाहेर जाणे व पुन्हा तातडीने मुख्यालयात हजर होणे आवश्यक असते. त्यामुळे विभागातील गट 'अ' मधील सह सचिव व उप सचिव दर्जाच्या अधिकाऱ्यांना तातडी /महत्वाचे काम विचारात घेता विमान प्रवास करण्यास तसेच विमान प्रवास खर्चाच्या प्रतिपूर्तीस मंजूरी देण्याचे अधिकार शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांकः-बीजीटी-१०००/प्र.क्र.५६/२०००/वित्तीय सुधारणा, दि.१०.९.०१ व क्र.बीजीटी-१००८/प्र.क्र.४९/२००८/वित्तीय सुधारणा/१, दि.१३.८.०८ मध्ये नमूद अटींच्या अधीन राहून अ.मु.स.(गृह)/प्रधान सचिव यांना प्रदान करण्यात येत आहेत. तसेच सदर अधिकाऱ्यांच्या विमान प्रवासास मान्यता देताना खालील अटी लागू रहातील.

१) विमानाने जोडलेल्या ठिकाणी इतर कोणत्याही मार्गाचे आरक्षण वेळे अभावी उपलब्ध न झाल्यास कामाची तातडी असेल तरच विमानाने प्रवास मंजूरी देण्यात येईल. परंतु संबंधित अधिकाऱ्यांनी कटाक्षाने अ.मु.स.(गृह)/प्रधान सचिव यांची पूर्व परवानगी घ्यावी.

२) परतीचा प्रवास रेल्वेनेच अनुज्ञेय राहील. परंतु न्यायालयीन विधानमंडळ कामकाज तसेच कायदा व सुव्यवस्थेच्या गंभीर प्रश्नीच परतीचा विमान प्रवास सचिवांच्या पूर्व परवानगीने अनुज्ञेय राहील.

३) विमानाने प्रवास करणाऱ्या अधिकाऱ्यांस विमान प्रवासाच्या आरक्षणासाठी क्रेडीट फॉर्मची सुविधा उपलब्ध होऊ शकेल.

४) राज्यांतर्गत हवाई मार्गावर इंडिगो सारख्या काही विमान कंपन्यांची अल्प दराने विमान सेवा उपलब्ध करुन दिल्या आहेत. अशा विमान प्रवास कंपन्यांच्या विमानाने (No Frills Airlines) प्रवास करावा. राज्यातील व राज्याबाहेर विमान प्रवासासाठी केवळ इकॉनॉमी क्लासनेच विमान प्रवास अनुज्ञेय राहील.

५) सदरचे आदेश, या विभागाच्या अधिनस्त कार्यासनांशी संबंधित वर्ग 'अ' अधिकाऱ्यांच्या विमान प्रवासा पुरताच सिमित आहे.

६) अशा विमान प्रवास खर्चाच्या प्रतिपूर्तीस येणारा खर्च "मागणी क्र.बी-४-२०५२-सेक्रेटरीएट-सर्वसाधारण सेवा (००) ०९० सेक्रेटरीएट-(००) (०१) गृह विभाग-११- देशांतर्गत प्रवास खर्च (२०५२०३०१) "या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकावा व त्या त्या आर्थिक वर्षाच्या मंजूर तरतूदीतुन भागविण्यात यावा.

सदरचे आदेश वित्त विभागाच्या सहमतीने व त्यांच्या अनौपचारिक संदर्भ क्र.३०/०९/सेवा-५, दि.२८.१.२००९ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

( प्र. ता. गौड )
सह सचिव, महाराष्ट्र शासन, गृह विभाग.

प्रति,

महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई,
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
अपर मुख्य सचिव(गृह) यांचे प्रशासकीय अधिकारी,
प्रधान सचिव (विशेष) यांचे वरीष्ठ स्वीय सहायक,
प्रधान सचिव(अ. व सु.)/प्रधान सचिव(परिवहन, बंदरे व राऊशु) यांचे स्वीय सहायक,
गृह विभागातील सर्व पर्यवेक्षीय अधिकारी,
गृह विभागातील सर्व अवर सचिव/कक्ष अधिकारी,
रोख उपशाखा, गृह विभाग,
निवडनस्ती, आस्थापना-२.